नवनिर्मित पालघर जिल्हयासाठी जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालय व जिल्हा परिषद करीता पदे निर्माण करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांकः आकृवि १९१४/प्र.क्र.२४७/१५अे
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२.
तारीख: २६ ऑगस्ट, २०१४.

वाचा :-

१) **शासन निर्णय क्रमांकः कृषि व पदुम विभाग, आकृवि १२०८/प्र.क्र.७२/१५अे, दि.२२ मे, २००९.**
२) **शासन निर्णय क्रमांकः कृषि व पदुम विभाग, आकृवि १२१०/प्र.क्र.४४६/१५अे, दि.३१.१०.२०११.**
३) **शासन निर्णय क्रमांकः महसुल व वन विभाग, अधिसुचना क्र.प्राफेब-११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दि.१७.६.२०१४.**
४) **शासन निर्णय क्रमांकः वित्त विभागाचे क्र.पदनि २०१४/प्र.क्र.५४/१४, विसु-१, दि.११.८.२०१४.**

**प्रस्तावना :-**

महसुल व वन विभाग क्र.प्राफेब-११०८/ प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दिनांक-१७.६.२०१४ च्या अधिसुचनांन्वये ठाणे जिल्हयाचे विभाजन करुन दि.१.०८.२०१४ पासुन पालघर, वसई, डहाणु, तलासरी, जव्हार, वाडा, मोखाडा आणि विक्रमगड या तालुक्यांचा समावेश करुन नवनिर्मित पालघर जिल्हा निर्माण करण्यात आला असुन त्यांचे मुख्यालय पालघर येथे ठेवण्यात आलेले आहे.

कृषि व पदुम विभागांतर्गत कृषि विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील कार्यालयाकरिता अधिकारी/ कर्मचारी यांच्या पदांचा आकृतिबंध दिनांक २२.५.२००९ च्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आला आहे. सदरचा आकृतिबंध निश्चित करताना कृषि विभागामार्फत राबविण्यात येणा-या विविध केंद्र/राज्य पुरस्कृत योजनानुसार कामाची व्याप्ती व अधिकारी/कर्मचा-यांच्या कर्तव्य जबाबदा-या विचारात घेऊन जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयासाठी ३७ पदे तसेच जिल्हा परिषदेकडील कृषि विभागाची ४ पदे सदर शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेली आहेत.

दिनांक ७.८.२०१४ रोजी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आलेल्या उच्चस्तरीय सचीव समितीच्या बैठकीमध्ये याबाबत सविस्तर चर्चा करण्यात येवुन नवनिर्मित पालघर जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयासाठी ३७ पदे व पालघर जिल्हा परिषदेच्या कृषि विभागासाठी ४ पदे नव्याने निर्माण करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन निर्णय :-**

कृषि व पदुम विभागाच्या दिनांक-२२.५.२००९ च्या शासन निर्णयान्वये कृषि विभागाच्या सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. सदर आकृतीबंधामध्ये जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयासाठी ३७ पदे निश्चित करण्यात आलेली आहेत. नवनिर्मित पालघर जिल्हयामध्ये समाविष्ठ तालुके विचारात घेऊन जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी पालघर कार्यालयासाठी खालील नमुद केल्याप्रमाणे ३७ पदे व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर कार्यालयासाठी ४ पदे निर्माण करण्यास खालील अटींच्या अधीन मान्यता देण्यात येत आहे.

१. चतुर्थश्रेणी कर्मचारी जसे शिपाई, पहारेकरी, नाईक, सफाईगार इ.असा वेगवेगळा संवर्ग न ठेवता एकच संवर्ग चतुर्थश्रेणी कर्मचारी असे पद कार्यरत राहील. आणि त्यांच्या कामाचे स्वरुप व जबाबदारी Multitasking स्वरुपाच्या असतील. सदर पदांची कामे बाहययंत्रणेकडुन करुन घेताना जॉब चार्ट निश्चित करुन, निकष ठरवुन कामे देण्यात यावी. बाहयस्रोताव्दारे ( Outsourcing) कामे करुन घेताना Multitasking करण्याची क्षमता असणारा मनुष्यबळ मिळविण्याचा प्रयत्न करण्यात यावा जेणेकरुन कमी मनुष्यबळाकडुन जास्त काम करुन घेणे शक्य होईल.

२. लिपिक टंकलेखक/ लघुलेखक या पदांना मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषेतील टंकलेखन/श्रुतलेखनाचे व संगणकाचे ज्ञान असणे आवश्यक राहील. या पदांची कामे प्रचलित नियमानुसार बाहययंत्रणेकडुन करुन घेण्यात यावीत.

२. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, पालघर कार्यालयासाठी मंजुर पदे :-

| अ.क्र. | संवर्गनिहाय पदे | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | १५६००-३९१०० ग्रेड पे-६६०० | १ |
| २ | कृषि उप संचालक | १५६००-३९१०० ग्रेड पे-५४०० | १ |
| ३ | महाराष्ट्र कृषि सेवा, वर्ग-२ | ९३००-३४८०० ग्रेड पे-४६०० | ४ |
| ४ | महाराष्ट्र कृषि सेवा वर्ग-२ (क) कृषि अधिकारी | ९३००-३४८०० ग्रेड पे-४४०० | २ |
| ५ | सहाय्यक प्रशासन अधिकारी, वर्ग-२ | ९३००-३४८०० ग्रेड पे-४४०० | १ |
| ६ | लेखा अधिकारी ( वर्ग-२) | ९३००-३४८०० ग्रेड पे-४४०० | १ |
| ७ | कृषि सहाय्यक | ५२००-२०२०० ग्रेड पे- २८०० | २ |
| ८ | अनुरेखक | ५२००-२०२०० ग्रेड पे-२०००<br>चार वर्षाच्या सेवेनंतर २४०० | २ |
| ९ | आरेखक | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | १ |
| १० | अधिक्षक | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | २ |
| ११ | वरीष्ठ लिपिक | ५२००-२०२०० ग्रेड पे -२४०० | ५ |
| १२ | लिपिक टंकलेखक | ५२००-२०२०० ग्रेड पे-१९०० | ३ |
| १३ | लघुलेखक ( निम्नश्रेणी ) | ९३००-३४८०० ग्रेड पे -४३०० | १ |
| १४ | लघुटंकलेखक | ५२००-२०२०० ग्रेड पे-२४०० | २ |
| १५ | वाहनचालक | ५२००-२०२०० ग्रेड पे -१९०० | २ * |
| १६ | चतुर्थश्रेणी कर्मचारी | ४४००-७४४० ग्रेड पे - १६०० | २* |
| | | ४४००-७४४० ग्रेड पे-१३०० | ५* |
| | एकुण | | ३७ |
| | *बाहयस्रोताव्दारे ( Outsourcing) | | |

३. पालघर जिल्हा परिषदेच्या कृषि विभागासाठी राज्य शासनाकडील मंजुर पदे

| अ.क्र. | संवर्गनिहाय पदे | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | कृषि विकास अधिकारी, महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ | १५६००-३९१०० ग्रेड पे-५४०० | १ |
| २ | मोहिम अधिकारी, महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब | ९३००-३४५०० ग्रेड पे-४६०० | १ |
| ३ | जिल्हा कृषि अधिकारी ( सर्वसाधारण), महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब | ९३००-३४५०० ग्रेड पे-४६०० | १ |
| ४ | जिल्हा कृषि अधिकारी ( विघयो), महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब | ९३००-३४५०० ग्रेड पे-४६०० | १ |
| | एकुण | | ४ |

२. उपरोक्त अस्थायी पदे कृषि व पदुम विभागांतर्गत कृषि विभागाच्या संबंधित कायम संवर्गातील तात्पुरती भर म्हणुन समजण्यात यावी या पदावरील पदधारकांना शासनाने वेळोवेळी काढलेल्या शासन निर्णयानुसार महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

३. वर नमुद केलेला खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येवुन वित्तीय वर्षाच्या मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

लेखाशीर्ष - मागणी क्रमांक डी-३,

२४०१ पीकसंवर्धन

००१, संचालन व प्रशासन, ( ००)(०२) विभागीय व जिल्हा कार्यालये

२४०१ ०१३६

जिल्हा परिषदेकडील पदांसाठी नमुद केलेला खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात येवुन वित्तीय वर्षाच्या मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

लेखाशीर्ष - मागणी क्रमांक डी-३

२४०१ पीकसंवर्धन

००१, संचालन व प्रशासन, ( ००)(०१) कृषि आयुक्तालय

२४०१ ०१३५४

४. सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्र.असंक १००१/प्र.क्र.२९/वित्तीय सुधारणा, दि.१०.९.२००१ अन्वये नविन पदनिर्मिती, व्यपगत पदांचे पुनरुज्जीवन, पदांचा आढावा इत्यादी प्रस्तावांची तपासणी करण्याकरिता गठीत करण्यात आलेल्या उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.७.०८.२०१४ रोजी झालेल्या ८७ व्या बैठकीत प्रस्तुत पदे निर्माण करण्यास देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२६१७४०००९३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Dattatreya Thakur

Digitally signed by Vilas Dattatreya Thakur
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Dattatreya Thakur
Date: 2014.08.26 18:03:16 +05'30'

**( वि.द.ठाकूर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा.मंत्री (कृषि व पणन ) / मा.मंत्री ( जलसंधारण ) / मा.मंत्री ( फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री ( कृषि/ जलसंधारण/फलोत्पादन ) यांचे खाजगी सचिव
६. मा.मुख्य सचिव
७. मा.अप्पर मुख्य सचिव (कृषि)
८. मा.अप्पर मुख्य सचिव ( सेवा ) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. प्रधान सचिव ( वित्त ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.प्रधान सचिव ( नियोजन ) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.सचिव ( ग्रामविकास ), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२.प्रधान सचिव ( जलसंधारण) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३.आयुक्त ( कृषि ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( १० प्रती )
१४.सदस्य सचिव, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे
१५.कुलसचिव ( सर्व कृषि विद्यापीठे ) ( व्दारा आयुक्त (कृषि), पुणे )
१६.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे / संचालक, महाराष्ट्र बिज प्रमाणिकरण यंत्रणा, अकोला
१७.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई
१८.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला
१९.संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
२०.सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि), पुणे )
२१.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( व्दारा आयुक्त (कृषि), पुणे )
२२.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

२३. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२४. मुख्य लेखा परिक्षक, स्थानि निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
२५. उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ अमरावती /नागपूर
२६. कृषि सह संचालक (आस्थापना) कृषि आयुक्तालय, पुणे
२७. सर्व विभागीय कृषि सह संचालक (व्दारा आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, पुणे)
२८. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (व्दारा आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, पुणे)
२९. सर्व कृषि विकास अधिकारी /सर्व उप विभागीय कृषि अधिकारी/सर्व तालुका कृषि अधिकारी (व्दारा आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, पुणे)
३०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा ) ½, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
३१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी ( व्दारा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे )
३२. सामान्य प्रशासन विभाग/ वित्त विभाग/ ग्रामविकाव व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
३३. सर्व कक्ष अधिकारी / उप सचिव / सह सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३४. निवड नस्ती/१५अे